**Administrative Approval to the Special Reparing of Panzara Bothali,**
**<u>Tal Arvi Dist.Wardha</u>**
**Change in Budget Head**

**पांझरा बोथली ल.पा. प्रकल्प (ता.आर्वी, जि. वर्धा) या प्रकल्पाच्या विशेष दुरुस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत (लेखाशीर्ष बदल)**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
शासन शुध्दीपत्रक क्र.दुरुस्ती २००९/(३३८/२००९)/सिंव्य(कामे)
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : २८/३/२०११**

**पहावे :** शासन निर्णय क्र. दुरुस्ती २००७/(३३८/२००९)/सिंव्य(कामे), दि.२०/७/२००९

**प्रस्तावना :**

पांझरा बोथली ल.पा. प्रकल्प (ता.आर्वी, जि. वर्धा) या प्रकल्पाच्या विशेष दुरुस्तीच्या रु. १६०.१८ लक्ष (रु. १४५.६१ लक्ष कामाप्रीत्यर्थ व अनुषंगिक खर्च रु. १४.५७ लक्ष ) किंमतीच्या प्रस्तावास शासन निर्णय क्र.दुरुस्ती २००९/(३३८/२००९)/सिंव्य(कामे), दिनांक २०/७/२००९ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली असून त्या कामावर होणारा खर्च २७०२-ल.पा. . (विस्तार व सुधारणा) (योजनांतर्गत) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्याबाबत नमुद करण्यात आले होते.

तथापि राज्यपालांच्या निर्देशाप्रमाणे सिंचन अनुशेषांतर्गत निधीचे वाटप सुत्रानुसार सन २०१०-११ या आर्थिक वर्षात विस्तार व सुधारणा खाली तरतुदीचे मुख्य लेखाशीर्ष ४७०२-लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) या खाली वैधानिक विकास मंडळनिहाय पाटबंधारे विकास महामंडळांना करण्यात आले आहे. याबाबत सुधारित आदेश काढण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शुध्दीपत्रक :</u>**

पांझरा बोथली ल.पा. प्रकल्पावर दि. ३१ मार्च २०१० अखेरचा झालेला खर्च २७०२-ल.पा.योजना . (विस्तार व सुधारणा) (योजनांतर्गत) या लेखा शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या खाली मंजुर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. सन २०१०-११ या आर्थिक वर्षापासून ( दि. १/४/२०१०) सदरहू प्रकल्पावरील खर्च हा ४७०२-लहान पाटबंधारे भांडवली खर्च (योजनांतर्गत) (८०) (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका (११) विस्तार व सुधारणा कार्यक्रमांतर्गत विदर्भ विभागाला भाग भांडवली अंशदान, (११) (१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान या

लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या खाली मंजुर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

इतर सर्व अटी मूळ शासन निर्णयानुसार राहतील.

हे शुध्दीपत्रक आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर(www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात येत असून त्यांचा संगणक सांकेतांक २०११०३२८१५५९२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( पां. तु. केदारे )**
शासनाचे अवर सचिव

प्रत :

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास, नागपूर
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर
आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (सिंव्य) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता चंद्रपूर पाटबंधारे प्रकल्प मंडळ,चंद्रपूर
अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
कार्यकारी अभियंता, चंद्रपूर पाटबंधारे विभाग, नागपूर.
उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय,
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.